ग्रामीण महाराष्ट्रातील सामाजिक परिवर्तन हेतूने राज्यात **“मिशन महाग्राम”** राबविण्याच्या कालावधीत वाढ करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः व्हीएसटीएफ-२०२५/ प्र.क्र.२९/ योजना-३

बांधकाम भवन, मर्झबान रोड
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
दिनांक: ०६ जून, २०२५

**वाचा :**

१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:व्हीएसटीएम:२०१६/प्र.क्र.२११/योजना-३, दिनांक २९ डिसेंबर,२०१६.
२) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : ग्रासाप - २०१७/ प्र.क्र. ५६ / योजना - ३, दिनांक ०१ मार्च,२०१७.
३) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : ग्रासाप - २०१७/ प्र.क्र. ६ / योजना - ३, दिनांक ०४ मार्च,२०१७.
४) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : ग्रासाप - २०१७/ प्र.क्र. ५६ / योजना - ३, दिनांक २५ सप्टेंबर,२०१७.
५) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : व्हीएसटीएम- २०१८/प्र. क्र.१६२/योजना -३, दिनांक १३ नोव्हेंबर,२०१८.
६) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक साववि - २०१९/ प्र. क्र. ४४/ फ-११, दिनांक १३ मे, २०१९.
७) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : जीपीडीपी - २०२०/प्र.क्र. ३९/पं. रा.६, दिनांक २५ सप्टेंबर,२०२०.
८) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: कृव्यप्र- ४६१८/प्र. क्र . १०२ /८- अे, दिनांक २४ जुलै,२०१८.
९) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कृ व्यप्र - ४६१८/प्र.क्र.१०२/८-अे, दिनांक १९ जानेवारी,२०१९.
१०) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक :- कृ व्यप्र - ४६१८/प्र.क्र.१२९/८-अे, दिनांक २७ मे,२०१९.
११) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक :- कृ व्यप्र ४६१९/प्र.क्र.५७/८-अे, दिनांक ११ सप्टेंबर,२०१९.
१२) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: व्हीएसटीएफ-२०१९/प्र.क्र.१८७/योजना-३, दिनांक ०८ एप्रिल,२०२२.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र हे प्रगतीशिल राज्य असून, शासनाच्या अनेक कल्याणकारी योजनांच्या माध्यमातून ग्रामीण भागाचा विकास करण्यात येत आहे. ग्रामीण जनतेला विकासाच्या मुख्य प्रवाहात आणण्याचे काम यातून होत आहे. त्याचाच एक भाग म्हणून, महाराष्ट्र शासनाने ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांक ग्रासाप-२०१७ प्र.क.५६/यो-३ दि. १ मार्च, २०१७ अन्वये राज्यात ग्राम सामाजिक परिवर्तन अभियानाची अंमलबजावणी करण्यासाठी तसेच या विभागा अंतर्गत स्थापित करण्यात आलेल्या कंपनीमध्ये राज्य शासनाचे भाग भांडवल उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात आली होती. शासकीय योजना व कार्यक्रमांचा कृतिसंगम, कार्पोरेट कंपन्यांच्या सामाजिक दायित्व (सी.एस.आर.) निधी व समाजातील सर्व घटकांच्या सहभागातून राज्यातील १००० गावे सक्षम करण्याचे उदिदष्ट निश्चित करण्यात आले होते.

२. या अभियानाच्या सन २०१७-२०२१ या कालावधीतील कामाचे सविस्तर मूल्यमापन अहवालास मा. मंत्रीमंडळाने मान्यता प्रदान केली आहे. या अभियानाचा कार्याचा अनुभव लक्ष्यात घेता, महाराष्ट्रात कार्पोरेट कंपन्यांचा सामाजिक दायित्व निधी (सी. एस.आर.) माध्यमातून अधिकाधिक प्रभावी कार्यक्रम व निधी राज्यात उपलब्ध होण्यास मोठी संधी आहे. तसेच ग्राम सामाजिक परिवर्तन फाऊंडेशन हे सी.एस.आर. कंपन्यांना महाराष्ट्र शासनासोबत सामाजिक क्षेत्रात काम करण्यासाठीचे अधिकृत व महत्वपूर्ण व्यासपीठ आहे. मा. उप मुख्य मंत्री (वित्त) यांच्या सन २०२२-२०२३ अर्थसंकल्पीय भाषात "मिशन महाग्राम" राज्यात राबविण्यात येणार असल्याचे घोषित करण्यात आले असून सदर मिशन राज्यात सन २०२२-२०२५ या कालावधीत राबविण्यास मा. मंत्रीमंडळाने मान्यता प्रदान केली आहे. मिशन महाग्राम या कार्यक्रमास मिळत असलेला प्रतिसाद पाहता, या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचा कालावधी वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

ग्रामीण महाराष्ट्रातील सामाजिक परिवर्तन हेतूने सन २०२२ ते २०२५ दरम्यान राज्यात मानव विकासाच्या अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण, जल व्यवस्थापन व उपजिविका या प्रमुख बाबीवर लक्ष केंद्रित करून विकासाचे शाश्वत ध्येय साध्य करण्यासाठी कार्पोरेट कंपन्यांच्या सामाजिक दायित्व निधीच्या माध्यमातून ग्राम सामाजिक परिवर्तन अभियान अर्थात -मिशन महाग्राम॰ ची राज्यात अंमलबजावणी करण्याच्या कालवधीस सन २०२२ ते २०२९ असा वाढविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. **मिशन महाग्रामचे क्षेत्रनिहाय उपक्रम :-**

१३) मिशन महाग्राम कार्यक्रमातील कृषी व कृषी सलग्न क्षेत्र, ग्रामीण गृहनिर्माण क्षेत्र, ग्रामीण आरोग्य क्षेत्र, पाणी पुरवठा व स्वच्छता, जलसंधारण क्षेत्र, शिक्षण क्षेत्र, उपजीविका क्षेत्र, विशेष प्रकल्प क्षेत्र यासह पुढील क्षेत्रांचा समावेश करण्यात येत आहे.

## I) उच्च शिक्षण क्षेत्र

**शासकीय विभाग:** उच्च व तंत्र शिक्षण विभाग

अ) मिशन महाग्राम अंतर्गत समाविष्ठ जिल्ह्यातील महाविद्यालये, विद्यापीठ यांचे सोबत खाजगी क्षेत्रातील उद्योजकांच्या मदतीने तरुण/तरुणींना रोजगाराभिमुख शिक्षण कार्यक्रम विकसित करण्यास प्रोत्साहन देऊन अभियांनातील गावामधील तरुणांचा अधिकाधिक समावेश वाढविणे, देशात व विदेशात रोजगार संधी निर्मिती करणे.

आ) महाविद्यालये, विद्यापीठ परिसरात उद्योग समूहाच्या मदतीने स्थानिक अर्थव्यवस्थेस पूरक रोजगार समुपदेशन केंद्र स्थापन करण्यास मदत करणे, विदेशात रोजगार संधी मिळवण्यास इच्छुक उमेदवारांना समुपदेशन, तांत्रिक मार्गदर्शन व निवड प्रकीयेस मदत करणे.

## II) नागरीकरण व पायभूत सुविधा क्षेत्र

**शासकीय विभाग:** नगर विकास विभाग व ग्राम विकास विभाग

अ) मिशन महाग्राम अंतर्गत समाविष्ठ जिल्ह्यातील महानगरपालिका, नगरपालिका कार्यक्षेत्रात काम करण्यास इच्छुक असणाऱ्या खाजगी कंपन्यांना भागीदारी विकसित करण्यास मदत करणे, महानगर, नगरपालिका क्षेत्रात घनवन पद्धतीने वृक्ष लागवड करणे, शहरी भागात मियावाकी पद्धतीचे प्रयोग राबविणे, शहरी भागातील हरित क्षेत्र वाढवण्यासाठी विविध उपक्रम राबविणे.

आ) मिशन महाग्राम अंतर्गत समाविष्ठ जिल्ह्यातील महानगरपालिका, नगरपालिका कार्यक्षेत्रात सांडपाणी व्यवस्थापन, घन कचरा व्यवस्थापन, पायाभूत सुविधा क्षेत्रात काम करण्यास इच्छुक खाजगी क्षेत्रास संबंधित महानगरपालिकेस भागीदारी विकसित करण्यास मदत करणे.

## III) कौशल्य व नाविन्यता क्षेत्र

**शासकीय विभाग:** कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता, युवक कल्याण, महिला व बालविकास

अ) मिशन महाग्राम अंतर्गत समाविष्ठ जिल्ह्यातील विविध क्षेत्रात काम करण्यासाठी आवश्यक असलेले कौशल्य क्षेत्र निहाय युवकांची माहिती संकलित करून राज्यासाठी महा-डेटाबेस तयार करणे, राष्ट्रीय कौशल्य विकास महामंडळ, राज्य कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांच्या माध्यमातून उपलब्ध रोजगार संधी ग्रामीण युवकांना अवगत करून देणे, रोजगाराबाबत जागरूकता निर्माण करणे.

आ) ग्रामीण युवकांना देशात व विदेशात रोजगार संधी उपलब्ध करून घेण्यासाठी मदत, मार्गदर्शन करणे.

### ३. मिशन महाग्रामची संस्थात्मक संरचना :-

#### अ) धोरणात्मक यंत्रणा

**१) कार्यकारी मंडळ** (Executive Council)

या मंडळामध्ये अतिरीक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग हे अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, ग्राम सामाजिक परिवर्तन फाऊंडेशन यांच्या सह-अध्यक्षते खाली संबंधित शासकीय विभागांच्या सचिवांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी व सर्व कार्पोरेट कंपन्याचे सामाजिक दायित्व निधी प्रमुख प्रतिनिधी (CSR Head) यांचा सहभाग असेल.

**२) संचालक मंडळ** (Board Of Director)

i. अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग हे कायमस्वरूपी पदसिध्द संचालक राहतील व संचालक मंडळात ९ सदस्य राहतील.

ii. महाराष्ट्र इन्स्टिट्यूटशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन (मित्र) या संस्थेचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे ग्राम सामाजिक परिवर्तन फाऊंडेशनचे पदसिद्ध व्यवस्थापकीय संचालक व पदसिद्ध अतिरक्त संचालक म्हणून संचालक मंडळात राहतील

iii. या मंडळामध्ये संबंधित विभागाचे सचिव जसे कृषी, शिक्षण आरोग्य, सहकार व पणन, पाणी पुरवठा व स्वच्छता, जल संधारण इत्यादींचा आवश्यकतेनुसार (एक) तसेच मा. मुख्यमंत्री हे एका वेळी एका वर्षासाठी नाम निर्देशित केलेले सामाजिक प्रतिष्ठीत व्यक्तींना (एक) अतिरिक्त संचालक म्हणून एक वर्षाच्या कालावधीकरिता समावेश करता येऊ शकेल.

iv. संचालक मंडळाच्या सदस्य (पाच) पदावर ग्राम सामाजिक परिवर्तन फाउंडेशन या कंपनीकरीता कार्पोरेट कंपन्यायांचे कडून रु. १० कोटी एवढे योगदान उपलब्ध करून देणाऱ्या भागीदारामधून एका वर्षाकरिता नियुक्त केले जातील व ते पुनर्नियुक्तीसाठी पात्र ठरतील.

v. या मंडळाचे सदस्य सचिव हे मिशन महाग्राम चे मुख्य कार्यकारी अधिकारी व सह सदस्य सचिव हे सह मुख्य कार्यकारी अधिकारी राहतील.

vi. ग्राम सामाजिक परिवर्तन फाउंडेशन संदर्भातील प्रशासकीय निर्णय जसे की या कंपनी अंतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी (CEO), मुख्य परिचालन अधिकारी तथा सह मुख्य कार्यकारी अधिकारी, मुख्य वित्त अधिकारी (CFO), कार्यकारी संचालक, अभियान व्यवस्थापक, कार्यक्रम व्यवस्थापक तसेच राज्य, जिल्हा व तालुका कक्षातील अधिकारी, कर्मचारी निवड करणे, सामाजिक दायित्व निधी मिळवणे, प्रकल्पाचे अंदाजपत्रक, नियोजन, अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन, इत्यादींना मान्यता देण्याची जबाबदारी व अधिकार सदर संचालक मंडळास राहतील.

**कार्ये:** संचालक मंडळ हे मिशन महाग्रामचे नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण व मुल्यमापन करणे व अनुषंगीक प्रशासकीय निर्णय घेतील तसेच मंडळ तीन महिन्यांनी व गरजेनुसार बैठक घेऊन आढावा घेऊन ग्राम सामाजिक परिवर्तन फाउंडेशन FCRA आणि AOA मधील तरतुदीनुसार कार्य करेल.

**ब) अंमलबजावणी यंत्रणा :-**

**१) राज्य अभियान व्यवस्थापन कक्ष**

- व्यवस्थापकीय संचालक, ग्राम सामाजिक परिवर्तन फाउंडेशन हे राज्य व्यवस्थापन कक्षाचे विभाग प्रमुख राहतील.
- संचालक मंडळाचे सदस्य सचिव अर्थात मुख्य कार्यकारी अधिकारी (CEO) हे राज्य व्यवस्थापन कक्षाचे प्रशासकीय प्रमुख राहतील.
- मुख्य कार्यकारी अधिकारी (CEO) या पदावर कॉर्पोरेट/ शासकीय क्षेत्रातील व्यक्तीची निवड करण्याचे अधिकार कंपनीच्या FCRA आणि AOA मधील तरतुदीप्रमाणे संचालक मंडळास राहतील.
- संचालक मंडळाचे सह सदस्य सचिव अर्थात सह मुख्य कार्यकारी अधिकारी हे ग्राम सामाजिक परिवर्तन फाऊंडेशन अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या प्रकल्पांचे प्रमुख राहतील.
- सह मुख्य कार्यकारी अधिकारी या पदावर खाजगी क्षेत्रातील व्यक्तीची निवड करण्याचे अधिकार कंपनीच्या FCRA आणि AOA मधील तरतुदीप्रमाणे संचालक मंडळास राहतील.
- मिशन महाग्राम मधील निवडलेली क्षेत्रे, प्रकल्प व उपक्रमांचा विचार करून योग्य ते मनुष्यबळ उपलब्ध करून देऊन संचालक मंडळाने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणे.
- राज्य, जिल्हा व तालुका कक्षातील अधिकारी, कर्मचाऱ्यांची निवड करणे, सामाजिक दायित्व निधी मिळविणे, प्रकल्पाचे अंदाजपत्रक, नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण व मुल्यमापन करणे इ.
- मिशन महाग्राम च्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तर, जिल्हास्तर व तालुका स्तरावर आवश्यकतेनुसार मनुष्यबळ घेण्यात येईल. तसेच मनुष्यबळावरील खर्च कार्पोरेट कंपन्यांच्या सामाजिक दायित्व निधीमधून सी.एस.आर. कायद्याच्या तरतुदीनुसार भागविण्यात येईल.
- ग्राम सामाजिक परिवर्तन फाउंडेशनसाठी बहुआयामी भागीदारी विकसित करण्यासाठी आवश्यक मनुष्यबळ घेणे.

४. मिशन महाग्रामची कार्यपध्दती, धोरणात्मक यंत्रणा मधील नियामक मंडळ व त्यांचे कार्य, कार्यकारी मंडळाचे कार्य, राज्य अभियान व्यवस्थापन कक्षाची कार्ये ही मुळ शासन निर्णय दिनांक ८ एप्रिल,२०२२ शासन निर्णयाप्रमाणे कायम ठेवण्यात येत आहे.

५. मिशन महाग्राम अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या उपक्रमांच्या अंमलबजावणीची सविस्तर मार्गदर्शक सुचना ग्राम सामाजिक परिवर्तन फाउंडेशन, राज्य अभियान व्यवस्थापन कक्ष यांचेकडून निर्गमीत करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०६११७३५६९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK ASHOK DAINGADE

Digitally signed by VIVEK ASHOK DAINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=53c2fccec74ddb1c052589e5cbaed9d19ba0d0043df169c83be27faeb8bf045b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=670EB0FA576F65F4406D031E11A90EA6FFB3AEFB253D401F5CED2AD1A6605DBF, cn=VIVEK ASHOK DAINGADE
Date: 2025.06.06 11:48:48 +05'30'

**( विवेक दाईंगडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा. मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. विधान सभा/ विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय मुंबई.
७. महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), महाराष्ट्र राज्य १ व २, मुंबई नागपूर
८. संचालक अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. संचालक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. मा. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन प्रशाकीय विभाग (सर्व).
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिट्यूटशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन (मित्र), मुंबई.
१२. व्यवस्थापकीय संचालक, ग्राम सामाजिक परिवर्तन अभियान, मुंबई.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, ग्राम सामाजिक परिवर्तन अभियान, मुंबई.
१४. विभागीय आयुक्त (सर्व).
१५. जिल्हाधिकारी (सर्व).

१६. जिल्हा कोषगार अधिकारी सर्व.
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१८. ग्राम विकास व पंचायत राज विभागातील सर्व सहसचिव/ उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
१९. उप सचिव, नियोजन (का १४११ व १४१४) मंत्रालय मुंबई.
२०. वित्त विभाग (का व्यय-१५ व अर्थ- १७), मंत्रालय, मुंबई.
२१. उपायुक्त (विकास), सर्व, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
२२. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व.
२३. जिल्हा नियोजन अधिकारी तथा नोडल अधिकारी मिशन महाग्राम जिल्हाधिकारी कार्यालय सर्व.
२४. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) तथा नोडल अधिकारी मिशन महाग्राम जिल्हा परिषद सर्व.
२५. निवड नस्ती (कार्यासन योजना- ३).